# 'ईश्वरवाद्यांची 'अंधश्रद्धा' आणि बुद्धिवाद्यांचा 'डोळसपणा'

प्र. ७






## 'ईश्वरवाद्यांची 'अंधश्रद्धा' आणि बुद्धिवाद्यांचा 'डोळसपणा'

*"आर्थिक किंवा शासन संस्थेवरील विश्वासाचा दुरुपयोग करून घेणारे राजकीय व आर्थिक क्षेत्रात 'बुवा' आहेत. पण म्हणून या संस्था कोणी वाईट म्हणत नाहीत, किंवा त्या वाईट ठरत नाहीत. गुन्हेगारांना जसे आर्थिक वा राजकीय क्षेत्र निषिद्ध नाही, तसे धार्मिक क्षेत्रही निषिद्ध नाही. पण धार्मिक क्षेत्रातील गुन्हेगारी निपटणे म्हणजे धर्मावरील श्रद्धा किंवा धार्मिक संस्था नष्ट करणे नव्हे".*

बुद्धिवाद्यांच्या दृष्टीने कोणत्याही गोष्टीवर पुराव्याशिवाय विश्वास ठेवणे ही अंधश्रद्धा ठरते. पुराव्याशिवाय केले जाणारे सर्व व्यवहार हेही बुद्धिवाद्यांच्या दृष्टीने अंधश्रद्धेत मोडतात, हे अर्थातच निराळे सांगण्याची आवश्यकता नाही. स्वाभाविकच बुद्धिवादी कोणताही व्यवहार पुराव्याशिवाय करीत नाहीत, असे मानणे चुकीचे ठरणार नाही.

या दृष्टीने पाहिले तर खरे बुद्धिवादी या जगात फक्त संन्यासी किंवा अध्यात्मवादी ठरतात. कारण प्रपंच दुःखदायक आहे याविषयी इतके पुरावे आहेत, की त्याकडे डोळेझाक करून प्रपंचात पडणे ही स्वतःच्या बुद्धीशी प्रतारणा आहे, तोच खरा आंधळेपणा आहे, हे ओळखून ते प्रपंचात पडतच नाहीत; आणि पडले तरी ते प्रपंचाविषयी उदासीन राहून अनासक्त वृत्तीने जगतात. पण या लोकांना कोणी बुद्धिवादी म्हणत नाहीत. आणि ज्यांना बुद्धिवादी म्हणतात, ते तर प्रपंचाचा त्याग करायला कधीच सांगत नाहीत. उलट प्रपंचात पडून त्यातील सुखांचा आंधळेपणाने ( म्हणजे प्रपंचातील दुःखाकडे डोळेझाक करून) उपभोग घ्यायला सांगतात. साहजिकच, ज्याला बुद्धिवाद म्हणून संबोधण्यात येते, तो खऱ्या अर्थाने बुद्धिवाद नाही, हे उघड आहे. तसेच ज्याला 'डोळसपणा' म्हणतात, तो खऱ्या अर्थाने अध्यात्मवाद्यांजवळ आहे, तथाकथित बुद्धिवाद्यांजवळ नाही हेही उघड आहे.१[1]

कदाचित प्रपंचात पडून मर्यादित अर्थाने बुद्धिवादी बनून जगावे असे बुद्धिवाद्यांना म्हणायचे असावे, पण या मर्यादित अर्थाने तरी बुद्धिवादी बनून जगता येते काय? म्हणजे पुराव्याशिवाय कोणताही व्यवहार करायचा नाही, असे ठरवून प्रपंचात जगता येते काय ? पुराव्याशिवाय कोणताही व्यवहार करणे हा धोका आहे, या दृष्टिकोनाला 'संशयवाद' म्हणतात. म्हणून प्रश्न असा आहे, की संशयवादी बनून जीवन जगता येते काय ?

---

[1] १. सुखाकडे (मग ते कितीही अल्प असेना का) डोळेझाक करणे हाच आंधळेपणा आहे, मिळेल त्या सुखाचा उपभोग घेणे हाच डोळलपणा आहे, असे बुद्धिवादी म्हणतील. पण (भौतिक) सुख आणि बुद्धिवाद यात विरोध आहे ते कसे हे पुढे दाखवून दिले आहे.

या प्रश्नाच्या उत्तरासाठी प्रपंचात पडण्याचेच उदाहरण घेऊ. ज्या मुलीशी (किंवा मुलाशी) आपण लग्न करायचे ठरवतो, त्या मुलीमुळे (अगर मुलामुळे) आपण प्रपंचत सुखी होऊ काय, याविषयी आपण कधी पुरावे शोधतो काय? (पुरावे सापडतात काय हा प्रश्न बाजूला ठेवू.) उलट या बाबतीत पुरावे शोधणे किंवा संशयी वृत्तीने (धोका आहे असे समजून) लग्न करणे हाच निर्बुद्धपणा आहे असे आपण मानतो. कारण प्रेमात पडणे हे बुद्धिवादाचे (चिकित्सकपणाचे, संशय वृत्तीचे) काम नसून भावनेचे (आंधळेपणाचे) काम आहे असे आपण मानतो. (प्रेम आंधळे असते (किंवा आंधळे प्रेम खरे असते) हा आपला याविषयीचा सिद्धांत प्रसिद्धच आहे!) अशा रीतीने मनुष्याला ज्याच्याशिवाय प्रपंचात जगताच येत नाही, त्या प्रेमासारख्या महत्त्वाच्या विषयातच बुद्धिवाद (संशयवाद) निरुपयोगीच नव्हे, तर अडचणीचा ठरतो ! २[23]

हीच गोष्ट नित्याच्या व्यवहाराच्या बाबतीतही खरी आहे. नेहमीचा कोणताही व्यवहार पुराव्याशिवाय करायचा नाही, संशयवादी बनूनच सर्व व्यवहार करायचे, असे ठरविले तर जीवन जगणेच अशक्य होऊन बसेल. उदा. प्रवासाला निघताना आपण अपघात होणार नाही, सुखरूप घरी परत येऊ याविषयी कधी पुरावे शोधतो काय? उदा. ज्या गाडीत आपण बसतो तिचे ब्रेक, ॲक्सल इ. भाग व्यवस्थित कार्य करतात काय चालक अनुभवी आहे काय इ. गोष्टींची खात्री करून मगच गाडीत चढतो काय? आणि एखाद्या चिकित्सकाने एवढे सगळे तपासले तरी अपघात होणार नाही, याची तो शंभर टक्के हमी देईल काय ?

तात्पर्य, आपण आपले नेहमीचे जे जीवन जगतो, ते जवळजवळ पूर्ण श्रद्धेने जगतो (या श्रद्धेचे समर्थन आपण ९९ टक्के अपघात होत नाहीत किंवा घटस्फोट घ्यावा लागत नाही, या आपल्या अनुभवाच्या आधारे केले तरी शेवटी तो श्रद्धाच असते.) अशा रीतीने पुराव्याशिवाय विश्वास ठेवून चालण्याच्या या आपल्या

---

२. पती पत्नी मधील प्रेम जितके आंधळे (दोषांकडे जितका कानाडोळा) तितका प्रपंच सुखाचा, जितकी संशयी वृत्ती ( दोषांची चिकित्सा) अधिक तितका तो दुःखाचा. अशा रीतीने बुद्धिवादाचे (संशयवादाचे) आणि प्रापंचिक सुखाचे प्रमाण व्यस्त आहे.

वागणुकीला कोणी अंधश्रद्धा म्हटले तर मात्र आपण हा आरोप तात्काळ ठोकरून लावू. पण पुरावे नसताना जीवन जगण्याचे, जीवनातील असंख्य गोष्टींवर विश्वास ठेवण्याचे, हे आपले धोरण ईश्वरावर 'पुरावे नसताना विश्वास ठेवण्याच्या धोरणाहून तात्त्विक दृष्ट्या यत्किंचितही भिन्न नाही.

पण ईश्वरावर पुरावे नसताना विश्वास ठेवण्याचे धोरण असे जे वर म्हटले आहे ते मुळात खरे नाही. कारण ईश्वरांचा वा अनेक देव-देवतांचा आपापल्या परीने अनुभव आल्याशिवाय लोक त्यांच्यावर विश्वास ठेवत नाहीत ही वस्तुस्थिती आहे.

आणि तरी त्यांच्या या विश्वासाला अंधश्रद्धा म्हणून संबोधण्यात येते आणि वर उल्लेख केलेल्या पुराव्याशिवाय जीवनात हरघडी असंख्य गोष्टींवर विश्वास ठेवण्याच्या प्रकाराला मात्र अंधश्रद्धा समजण्यात येत नाही. हा कुठला न्याय ?

याला 'बुद्धिवादी' न्याय म्हणतात. 'अंधश्रद्धा निर्मूलनवादी' न्याय असे याचे दुसरे नाव आहे. या न्यायाला कायदेशीर स्वरूप प्राप्त व्हावे, तो (कायदा) न पाळणाऱ्याला न्यायालयातर्फे विधिवत दंड शिक्षा व्हावेत, याबद्दलही या न्यायप्रिय लोकांचे प्रयत्न सुरू आहेत. अशा रीतीने समाजातील धार्मिक श्रद्धा (अंधश्रद्धा) कायद्याने नाहीशा होतील, अशी या बुद्धिवाद्यांची श्रद्धा नव्हे 'डोळस' दृष्टिकोन आणि तर्ककठोर आशावाद आहे !

काही लोकांचा मनःपिंड बुद्धिवादी असतो, तसा काहींचा श्रद्धावादी (धार्मिक) असू शकतो. हा दृष्टिकोनाचा फरक आहे. आणि प्रत्येकाला आपापल्या दृष्टिकोनाप्रमाणे जीवन जगण्याचा हक्क आहे. आपलाच दृष्टिकोन बरोबर म्हणून तो दुसऱ्यावर लादणे, कोणत्याही दृष्टीने समर्थनीय ठरत नाही. त्यासाठी चळवळ उभारणे तर अक्षम्य ठरते. कोणत्याही चांगल्या गोष्टीचा दुरुपयोग होऊ शकतो. दुरुपयोग होतो म्हणून ती गोष्ट वाईट ठरत नाही. धार्मिक श्रद्धेचा दुरुपयोग (लाभ) गुन्हेगार जसा बुवाबाजीने करून घेतात, तसा (जसे आर्थिक व राजकीय क्षेत्रातील गुन्हेगारी निपटणे म्हणजे आर्थिक व राजकीय संस्था नष्ट करणे नव्हे.) असे करणे म्हणजे डोकेदुखी होते म्हणून डोकेच छाटून टाकण्यासारखे आहे. पण हा विवेक बुद्धिवाद्यांजवळ असल्याचे त्यांच्या चळवळीवरून दिसून येत नाही. हा विवेक त्यांनी

केला, तर बऱ्याच अप्रिय घटना टळतील. निदान समाजाला ते उपद्रवकारक तरी ठरणार नाहीत.

पण आमचे भांडण बुद्धिवाद्यांशी नाही, तर बुद्धिवादाशी आहे. बुद्धिवाद्यांनी कसे वागावे, काय करावे, काय करू नये हे सांगण्याचा आम्हाला अधिकार नाही. त्यांनी आपल्याला समजलेला बुद्धिवाद खुशाल जगावा. पण आपला बुद्धिवाद ज्या विज्ञानावर आधारल्याचा ते दावा करतात, त्या विज्ञानाचा त्याला कितपत आधार मिळतो किंवा तो मिळतो काय, हे तपासण्याचा अधिकार सर्व विज्ञानवाद्यांना आहे. कारण विज्ञानवाद हा काही बुद्धिवाद्यांचा मक्ता नाही. या वैज्ञानिक दृष्टिकोनातून त्यांचा हा दावा फोल असल्याचे आपण यापूर्वी **विज्ञान व बुद्धिवाद** या ग्रंथातील अनेक प्रकरणांतून सप्रमाण दाखवून दिले आहे. (विज्ञानाचा जन्मच बुद्धिवादाविरुद्ध बंड करून झाला असल्याची इतिहासाची साक्ष असल्याने विज्ञान आणि बुद्धिवाद यात विस्तव जात नसल्याचे त्या लेखातून दाखविले आहे.) आता विज्ञानानेच मनुष्य डोळस बनतो हे सर्वमान्य आहे. पण विज्ञानावर बुद्धिवाद आधारलेला नसल्याने, किंवा त्याची बुद्धिवादाला कसलीच पुष्टी मिळत नसल्याने बुद्धिवाद डोळस कसा ठरतो, हे बुद्धिवाद्यांनी सिद्ध करून दाखवले पाहिजे. तरच बुद्धिवाद डोळस आहे हे मान्य करता येईल. पण त्यांनी हे कोठे सिद्ध केल्याचे आढळून येत नाही. केवळ बुद्धिवादाचा विज्ञानाच्या आधारे ते पुरस्कार करताना आढळतात, पण तो विज्ञानाचा पुरस्कार ठरतो. बुद्धिवादाचा पुरस्कार ठरत नाही. पण बुद्धिवाद्यांनी आम्ही विज्ञानाचे पुरस्कर्ते आहोत, हे तुणतुणे वाजवत राहिल्याने ते विज्ञानवादी असल्याचा बोलबाला मात्र होतो. पण त्यामुळे ते विज्ञानवादी आहेत हे तर सिद्ध होत नाहीच. पण विज्ञानवादसुद्धा या लोकांच्या बुद्धिवादांप्रमाणे आडमुठा आहे की काय अशी शंका विज्ञानाची खरी ओळख नसलेल्या लोकांच्या मनामध्ये निर्माण होते. आणि विज्ञानवादी दृष्टी समाजात रुजवण्याच्या सेवेच्या नावाखाली सत्यान्वेष ही जी खरी वैज्ञानिक दृष्टी आहे, तिची हानी करण्याची 'सेवा' मात्र त्यांच्या हातून बुद्धिपुरस्सर घडत असल्याचे जाणत्या लोकांना उघड्या डोळ्यांनी पाहावे लागते.

बुद्धिवाद विज्ञानाच्या आधारे डोळस असल्याचे कोणी सिद्ध केले नाही, असे वर म्हटले आहे; याचे कारण असे सिद्ध करता येत नाही हे आहे. आणि हे तात्त्विक

(सैद्धांतिक ) आणि व्यावहारिक या दोन्ही दृष्टीने सिद्ध करता येत नाही. बुद्धिवाद्यांचा मेरूमणी असलेल्या बट्रांड रसेलने हे ओळखूनच विज्ञानाच्या आधारे बुद्धिवादाचा केवळ पुरस्कार केला आहे. आणि तात्त्विक दृष्टीने जो सिद्ध होतो,

तो संशयवाद स्वीकारला आहे. (उदा. आपल्या Sceptical Essays या ग्रंथात On the value of Scepticism या निबंधात तो म्हणतो, 'माझ्या मते बुद्धिवादाला निश्चितच मोठ्या मर्यादा आहेत. जीवनातील काही सर्वात महत्त्वाच्या क्षेत्रात बुद्धीला शिरकाव करू दिला तर जीवनच बरबाद होईल.३[4] पृ. १९) पण अशा रीतीने तात्त्विक दृष्टीने सिद्ध होणारा संशयवाद जीवनात पूर्णपणे स्वीकारला आणि निष्ठेने तो पाळण्याचे ठरविले तर जीवन जगणेच अशक्य होऊन बसते हे वर दाखवून दिलेच आहे. गीतेत '**संशयात्मा विनश्यति**' असे जे म्हटले आहे, ते अशा तत्त्वनिष्ठ आणि अतिरेकी संशयवादाच्या दृष्टीने म्हटले आहे. कारण माफक प्रमाणात संशयवाद जीवनात आवश्यक असून त्याला 'सावधगिरी' (Prudence) म्हणतात. बुद्धिवाद किंवा बुद्धिनिष्ठा (rationalism) म्हणत नाहीत.

मग जीवनात बुद्धिप्रामाण्यवादी बनावे किंवा बुद्धिनिष्ठ जीवन जगावे असे जे म्हटले जाते, त्याचा नेमका अर्थ काय? भुते अस्तित्वात नाहीत असे मानावे, किंवा पटकी देवीच्या प्रकोपामुळे होत नसून जंतूमुळे होते असे मानावे, व असे न मानणाऱ्याला म्हणजे भुते आहेत असे म्हणणान्याला किंवा देवीच्या कोपामुळे पटकी होते असे म्हणणाऱ्याला अंधश्रद्धाळू म्हणावे याला बुद्धिवाद म्हणायचे काय? पण भुते आहेत की नाहीत, किंवा पटकी कशाने होते, हे वैज्ञानिक संशोधनाचे म्हणजे पुरावे शोधण्याचे प्रश्न आहेत. पुरावे शोधणे हे सामान्य माणसाचे काम नाही आणि तसे शोधून प्रत्येक व्यवहार करणे शक्यही नाही. असे जीवन कोणीही रसेलसारख्या निष्ठावंत बुद्धिवाद्यांनेही जगलेले नाही. कारण ते जगणे अशक्य आहे. म्हणजे नेहमीचे जीवन श्रद्धेनेच जगले पाहिजे आणि असे श्रद्धेने, म्हणजे पुराव्याच्या भानगडीत न पडता जीवन जगणा-याला कोणी अंधश्रद्धाळू म्हणत नाहीत. आणि वैज्ञानिक

---

4

**3. There are very difinite limits, to my mind, within which rationality should be conflined; some of the most important departments of life are ruined by the invasion of reason.**

संशोधनाने पुरावे सादर करून जे प्रस्थापित झाले आहे, ते सामान्यपणे कोणी नाकारीत नाही. 'सामान्यपणे' म्हणण्याचे कारण भारतासारख्या मागासलेल्या देशात अशी काही ठिकाणे असणे शक्य आहे, की जेथे हे पुरावे तेथील लोकांच्या गळी उतरलेले नसतील. अशा ठिकाणी शिक्षण प्रसार हा उपाय आहे. तात्पर्य, मानवाने आपले जीवन विज्ञाननिष्ठ बनून जगावे, असे म्हणणे सर्व दृष्टींनी समर्थनीय ठरते.

मग जीवनात बुद्धिप्रामाण्यवादाचा आग्रह कोणत्या दृष्टीने धरण्यात येतो ? व तो का धरण्यात येतो? विज्ञाननिष्ठेहून भिन्न असा 'बुद्धिनिष्ठे' ना काही प्रकार आहे का की जो स्वीकारला नाही तर तो न स्वीकारणारा 'अंधश्रद्धाळू ठरतो ? असा काही प्रकार असल्याशिवाय बुद्धिवादाचे स्तोम या बुद्धिवाद्यांनी इतके माजवले नसते !

आणि खरोखरच विज्ञाननिष्ठेहून भिन्न असा 'बुद्धिनिष्ठेचा खास प्रकार असून या प्रकारात विज्ञाननिष्ठा पुरेशी नाही असे मानण्यात येते. व विज्ञाननिष्ठेलाही तात्पुरते हद्दपार करण्यात येते. 'अंधश्रद्धा' ठरविण्यात येते! विज्ञाननिष्ठा आणि तीही अंधश्रद्धा? होय, काही बाबतीत विज्ञाननिष्ठा ही अंधश्रद्धाच होय, असा या बुद्धिवाद्यांचा दृष्टिकोन आहे. म्हणून कुठे वैज्ञानिक संशोधन करावे, कुठे करू नये, कुठे पुरावे स्वीकारावंत, कुठे स्वीकारू नयेत हे ठरविण्याचे हक्क हे बुद्धिवादी आपल्याकडे घेतात व 'सत्य' काय हे ते स्वतःठरवितात! स्वाभाविकच हे त्यांचे म्हणणे, त्यांची ही 'सत्या' ची मक्तेदारी सहजासहजी कोणी मान्य करीत नसल्यामुळे, मान्य करणे शक्य नसल्यामुळे, त्यांना त्यासाठी चळवळ करावी लागते; आपले म्हणणे कायद्याने सिद्ध करण्याचा प्रयत्न करावा लागतो. तो कायदा करावा म्हणून धरणे धरावे लागते. तात्पर्य, राजकारण करावे लागते अर्थात, बुद्धिवादी सत्यासाठी राजकारण ! खुर्चीच्या सत्तेसाठी करतात तसे! आणि अशा रीतीने विज्ञाननिष्ठांची इच्छा नसूनही खरे विज्ञान आणि खोटे विज्ञान असा झगडा सुरू होतो. आणि जे सर्वांच्या अनुभवाचे आहे आणि म्हणून जे सूर्यप्रकाशाइतके स्पष्ट आहे, आणि ज्याला विज्ञानाचा आधार आहे, ते सिद्ध करण्यासाठी व केवळ ते डोळ्यांना दिसत नाही म्हणून ते नाकारणे कसे आडमुठेपणाचे आहे हे दाखवून देण्यासाठी निष्कारण शक्ती खर्च करावी लागते. भूत डोळ्यांना दिसते का? खोटे भानामती डोळ्यांना दिसते का? खोटी ! भूत भविष्य ओळखता येते का? खोटे खरे म्हणत असाल तर आम्हाला हे सर्व दाखवा! आणि

लाखांचे बक्षिस जिंका नाहीतर हे सर्व खोटे म्हणून कबूल करा. हे बक्षिस कोणी जिंकलेले नसल्यामुळे हे सर्व खोटे हे सिद्धच आहे ! खरे आणि खोटे यातील वैज्ञानिक अंतर अशा रीतीने एक किंवा दोन लाख रुपये ! वैज्ञानिक सत्याची ही किंमत आहे कारण वैज्ञानिक सत्य संशोधनाने किंवा अभ्यासाने ठरत नसून पैशाने ठरत असते ! अशा रीतीने सत्ता (कायदा) आणि पैसा ह्या त्यांच्या सत्याच्या दोन बुद्धिवादी कसोट्या होत ! डोळ्यांनी न दिसणाऱ्या कोणत्याही गोष्टीवर बुद्धिवाद्यांची श्रद्धा नसली, तरी याला एक अपवाद आहे. तो अपवाद म्हणजे त्यांची स्वतच्ची बुद्धी! त्यांची स्वतः च्या बुद्धीवर मात्र अपरंपार श्रद्धा आहे !

आता प्रश्न असा आहे, की वैज्ञानिक बुद्धीला डावलून या बुद्धिवाद्यांच्या बुद्धीवरच श्रद्धा का ठेवावी? तिलाच डोळस श्रद्धा का म्हणावे? कारण वैज्ञानिक बुद्धीला जे सत्य अजून सापडलेले नाही, आणि भविष्यात कधी सापडणार नाही, ते या बुद्धिवाद्यांच्या बुद्धीला केव्हाच सापडले आहे ! ते सत्य म्हणजे पाच ज्ञानेंद्रियांना जे कळते तेच खरे! अतींद्रिय म्हणून काही अस्तित्वातच नसल्यामुळे त्याच्या संशोधनाचा प्रश्नच उपस्थित होत नाही. आणि म्हणून त्यांच्या पुराव्याचाही, ते पाहण्याचाही प्रश्न उपस्थित होत नाही.

सर्वच बुद्धिवादी विज्ञानविरोधाची ही टोकाची भूमिका घेत नाहीत. काहीजण अतींद्रिय विज्ञानाचे पुरावे नाकारणे आडमुठेपणाचे आहे हे ओळखून ते स्वीकारतात. पण तरीही बुद्धीवाद ज्याला ते जडवाद म्हणतात खोटा ठरतो, हे मान्य करीत - - नाहीत. परचिराज्ञान (टेलिपथी) वगैरे प्रकार अदृश्य व अजून ज्ञात नसलेल्या घटकांमार्फत घडून येत असावेत, आणि ते कसेही घडून येत असले तरी ते घडून येतात, त्याअर्थी तो भौतिक जगाचे ज्ञान करून देणारा एक ज्ञानप्रकार म्हणून जड-वादाशी सुसंगतच आहे असे समजतात. (उदा. Philosophy and Psychical Research- या एस्. ठाकूर संपादित ग्रंथातील डेव्हिड कूपर यांचा Materialist theory of Mind हा लेख पाहा. याचा प्रतिवाद बेलॉफने Handbook of Para-psychology मधील आपल्या लेखात केला आहे.) अतींद्रिय ज्ञान जडवादात बसवण्याची ही कसरत डोक्याने सुद्धा चालता येते, हे दाखवून देण्याच्या प्रकारात मोडत असल्यामुळे त्याचा येथे विचार करण्याची आवश्यकता नाही. पण काही

बुद्धिवादी आपली भूमिका टिकवण्यासाठी कोणत्या थराला जाऊ शकतात, याची यावरून कल्पना येऊ शकते.

टेलिपथीसारखा अतींद्रिय ज्ञानप्रकार जडवादात बसत असेल (आणि जडवादी दृष्टी डोळस असेल) तर ईश्वराचे अतींद्रिय ज्ञान होते असे मानणे ही अंधश्रद्धा कशी ठरते? या प्रश्नाला बुद्धिवाद्यांचे (जडवाद्यांचे) काय उत्तर आहे, हे कळायला मार्ग नाही, पण ते काय असेल याचा तर्क करता येतो. ते कदाचित असे म्हणतील की इतर अतींद्रिय ज्ञानप्रकाराचा जसा पडताळा पाहता येतो, तसा ईश्वरी ज्ञानाचा पडताळा कुठे पाहता येतो? या प्रश्नाला दोन प्रकारे उत्तर देता येते. पहिल्या प्रकारचे उत्तर असे, की ज्या अतींद्रिय ज्ञानाचा पडताळा पाहता येतो, त्या ज्ञानाची सत्यता हाच ईश्वराच्या अतींद्रिय अस्तित्वाचा पडताळा होय. (कारण ईश्वर ही सर्वश्रेष्ठ अतींद्रिय शक्ती आहे, असे ईश्वरवाद्यांचे गृहीतकृत्य आहे.) आतापर्यंत अतीद्रिय ज्ञानप्रकाराला (घटनांना) चमत्कारात ढकलून काही लोक मोकळे होत होते. त्यामुळे स्वाभाविकच दोन तट (पक्ष) पडले होते, एक चमत्कार मानणारा, म्हणजे ईश्वर लहरी आहे (किंवा स्वतच्र निर्माण केलेल्या विश्वाचे नियम न पाळणारा आहे) असे म्हणणारा अंधश्रद्धाळू लोकांचा वर्ग व दुसरा, चमत्कार भौतविज्ञानाच्या नियमांचे उल्लंघन करणारे असल्यामुळे अशक्य (किंवा थोतांड) मानणारा विज्ञानवादी लोकांचा वर्ग. पण हे दोघेही चुकले होते, हे आता या तथाकथित चमत्कारांची सत्यता वैज्ञानिक संशोधनाने पुराव्यानिशी प्रस्थापित झाल्यामुळे स्पष्ट झाले आहे. त्यामुळे ज्यांना चमत्कार समजण्यात येत होते, ते वास्तविक अतींद्रिय विश्वातील नियमानुसार घडणाऱ्या क्रमबद्ध (graded) घटना असून त्यांचा केंद्रबिंदू जड (भौतिक) जगत् नसून मानव चैतन्य आहे, हे स्पष्ट झाले आहे. त्यामुळे मानवाच्या चैतन्याची प्रत (grade) जितकी उच्च तितकी या घटनांचा अनुभव जास्त. म्हणून अत्युच्च प्रतीचे चैतन्य प्राप्त करणारा मनुष्य स्वतः ईश्वरच बनतो, असे या घटना सूचित करतात. त्यांना, म्हणजे ज्यांना चमत्कार खोटे, म्हणून ईश्वर खोटा असे म्हणायचे असेल त्यांना, (चमत्कार खोटे) हा युक्तिवाद ईश्वराचे अस्तित्व नाकारण्यासाठी अतःपर करता येणार नाही. अशा रीतीने अतींद्रिय विज्ञानाचा (परामानसशास्त्राचा ) उदय हा (ईश्वररूपी) अतींद्रिय शक्तीच्या अस्तित्वाच्या विरोधकांना अनुल्लंघनीय अडसर ठरला आहे.

आणि मरणोत्तर अस्तित्वाचे पुरावे परलोकाच्या कल्पनेला पोषक ठरल्यामुळे या ईश्वररूपी अतीद्रिय शक्तीच्या अस्तित्वाला परलोक (अतींद्रिय विश्व) हा जास्त बळकटी आणणारा नवा आधार मिळाला आहे.

दुसऱ्या प्रकारचे उत्तर असे, की ईश्वर प्रत्यक्ष आणि अनुमान प्रमाणांनी पडताळा पाहता येणारी भौतवस्तू नाही. ती चैतन्ययुक्त शक्ती आहे. आणि म्हणून तिच्या अस्तित्वाचे ज्ञान चेतनेनेच अनुभवानेच होणार. साखरेसारखी भौतवस्तु गोड आहे, हे सुद्धा जेथे अनुभवाशिवाय कळत नाही, म्हणजे प्रत्यक्ष व अनुमान प्रमाणांनी ज्ञात होत नाही, तेथे चैतन्यशक्तीचे ज्ञान प्रत्यक्ष व अनुमान प्रमाणांनी व्हावे, अनुभवाशिवाय कळावे ही अपेक्षा कशी धरता येईल? तथापि ईश्वर ही अतींद्रिय शक्ती साखरेसारखी कोणीही चव घेऊन पाहावी अशी (भौतिक) वस्तु नाही. त्यासाठी प्रथम ईश्वराच्या अस्तित्वावरच बळकट श्रद्धा असावी लागते. पण ईश्वरच (किंवा अतींद्रिय शक्तीच नाही असे म्हणणारे बुद्धिवादी त्याच्यावर श्रद्धा कशी ठेवतील ? (बळकट श्रद्धा ठेवण्याचा तर प्रश्नच दूर.) आणि म्हणून त्याचा त्यांना अनुभव कसा येईल? ईश्वराचा रोग होऊ नये म्हणून ज्यांनी स्वतला बुद्धिवादाची लस टोचून घेतली आहे, त्यांना तो रोग होणारच नाही, आणि म्हणून बुद्धिवाद्यांच्या दृष्टीने ईश्वरावरील श्रद्धा ही नेहमीच अंधश्रद्धा ठरणार. हा रोग होऊ नये म्हणूनच बुद्धिवादाची लस सर्वांनाच टोचली तर कोणालाच ईश्वराची लागण होणार नाही, ज्या समाजात सर्वच पुरुष हिजडे (षंढ आहेत, त्या समाजात 'रतिसुख' हा प्रकारच अस्तित्वात असणार नाही. आणि असा एक प्रकार आहे असे कोणी म्हणू लागला तर ती अंधश्रद्धा समजण्यात येईल. आंधळ्यांच्या जगात प्रकाश नावाचे काही आहे असे समजणे हीच अंधश्रद्धा ठरते! असा हिजड्यांचा आणि आंधळ्यांचा समाज निर्माण करणे शक्य नसले, तरी बुद्धिवाद्यांचे ते एक स्वप्न आहे. आणि ते स्वप्न पाहण्याचा त्यांना पूर्ण हक्क आहे. शेवटी सगळेचजण स्वप्नावर, श्रद्धेवर जगतात आणि श्रद्धेने जगणारे पुराव्याच्या भानगडीत पडत नाहीत. हा बुद्धिवाद्यांचाच सिद्धांत आहे. तेव्हा याविषयी पुरावे विचारणे चुकीचे ठरते. ४[5]

[5] ४. आम्ही कसलेही स्वप्न पाहत नाही असे बुद्धिवादी म्हणतील. पण समाजातून अंधश्रद्धांचे 'निर्मूलन' करणे शक्य आहे काय? समाजातून धर्मांचे कायद्याने उच्चाटन करण्याचा जगातील सर्वात मोठा, ज्याला जगात दुसरी तोड नाही, असा प्रयोग रशियाने

टीप: तार्किक दृष्ट्या ईश्वर सिद्ध होत नाही, हे दाखवून देण्यासाठी बुद्धिवादी पुढील युक्तिवाद करतात. ईश्वर सर्वशक्तिमान आहे. कारण त्यानेच हे सर्व विश्व निर्माण केले आहे असे तुमचे म्हणणे असेल, तर आम्ही विचारतो की विश्व राहू द्या, तो असला मोठा दगड निर्माण करू शकेल का, की जो त्याला स्वतलाच उचलता येणार नाही? निर्माण करू शकतो असे म्हणत असाल, तर तो दगड स्वतच्च उचलू शकत नसल्यामुळे तो सर्वशक्तिमान नाही हे सिद्ध होते. आणि निर्माण करू शकत नाही असे म्हणत असाल, तर त्याच्या निर्माणक्षमतेला मर्यादा पडत असल्यामुळे तो सर्वशक्तिमान नाही हे सिद्ध होते. तात्पर्य, सर्वशक्तिमान ईश्वर असू शकत नाही. तर्काने ईश्वर सिद्ध होत नाही. (त्याचा पडताळा पाहता येत नाही). ईश्वर अनुभवाचा विषय आहे ही भूमिकाच ईश्वरवाद्यांची असल्यामुळे बुद्धिवादी या युक्तिवादाने (हा युक्तिवाद बरोबर असेल तर ) ईश्वरवाद्यांचेच म्हणणे सिद्ध करीत आहेत हे त्यांच्या लक्षात येत नाही ! तथापि, हा युक्तिवाद तर्कदुष्ट आहे. यातील दोष असा, की येथे दोन भिन्न तार्किक पातळीवरील (universe of discourse) विधाने एकत्र केली आहेत. जो ईश्वर शून्यातून वस्तु निर्माण करू शकतो, तो ती परत शून्यात नेऊ शकतो. मग ती उचलण्याची मातब्बरी काय, असे याला त्याच पद्धतीने उत्तर देता येते.

---

केला, आणि तब्बल ७० वर्षांच्या प्रयत्नानंतर तो (कम्युनिझमप्रमाणेच) फसल्याची व आपण ही चूक केल्याची त्याला कबुली द्यावी लागली. (गोदामे बनवलेली चर्चेस लोकांना परत करावी लागली.) पण भारतातील बुद्धिवादी (भारतातील कम्युनिस्टांप्रमाणेच) या पुराव्याकडे डोळे उघडून पाहणार नाहीत.

## UNIVERSE OF DISCOURSE

- Note that **no** universe of discourse is a **totally** fictitious world.

- ***Santa Claus*** is a fiction, **but** the toy telephones he might bring do **actually exist**.
- **Interaction between** fact and fiction, between real and imaginary **worlds**.

- When two people are '**arguing at cross-purposes**',
- **working within partially different universes of discourse.**
- ***Example***:

63

15